# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्पीय) अधिवेशन, २०२३

---

**अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी**

**प्रश्नांची एकूण संख्या - २०**

---

### राज्यातील कोरोना पॉझिटिव्ह शासकीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांना विशेष रजा मंजूर करण्याबाबत

**(१) ९२४५ (१८-०६-२०२१) श्री.रमेशदादा पाटील, श्री.नागोराव गाणार, श्री.निलय नाईक :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात लॉकडाऊन कालावधीत घरुन काम केल्याचे मानधनाबाबत व कोरोना पॉझिटिव्हच्या संपर्कात आलेल्या तसेच कोरोना पॉझिटिव्ह असलेल्या कर्मचाऱ्यांना विशेष रजा देण्यास अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांनी कार्यालयीन आदेश काढून मंजूरी दिल्याचे दिनांक २४ मार्च, २०२१ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोरोना संसर्ग झालेल्या राज्यातील सर्वच शासकीय अधिकारी/कर्मचारी यांनादेखील वरील आदेशातील सूचनेनुसार विशेष रजा मंजूर करण्याची मागणी लोकप्रतिनिधी व शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, लॉकडाऊन लागू झाल्यापासून जे शासकीय अधिकारी/कर्मचारी कोरोना पॉझिटिव्ह झाले आहेत त्यांना विशेष रजेची तरतूद करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, त्याबाबतची सविस्तर माहिती काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. तानाजी सावंत (२२-११-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) कोरोना संसर्ग झालेल्या राज्यातील शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना विशेष रजेची तरतूद करण्याबाबतचा कोणताही निर्णय शासनस्तरावर घेण्यात आलेला नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पशुवैद्यकीय पदवी नवीन अभ्यासक्रमाच्या अंतिम वर्षातील विद्यार्थ्यांना इंटर्नशीप भत्ता देण्याबाबत

**(२) १०२६६ (०६-१०-२०२१) श्री.नागोराव गाणार, श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात भारतीय पशुवैद्यकीय परिषदेच्या नियमानुसार पशुवैद्यकीय पदवी नवीन अभ्यासक्रमाच्या अंतिम वर्षातील विद्यार्थ्यांना एक वर्षाची इंटर्नशीप करणे अनिवार्य आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मा.केंद्रीय पशुपालन व मत्स्यपालन मंत्री महादेयांनी रुपये १५ हजार इंटर्नशीप भत्याच्या घोषणेची राज्यात पुर्तता न झाल्याने विद्यार्थी आर्थिक संकटात आले असल्याचे माहे जानेवारी २०२० च्या पहिल्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, विद्यार्थ्यांना नागपूर, उदगीर, सातारा, परभणी, पुणे, मुंबई येथील शहरामधील शासकीय दवाखाने, पशुवैद्यकीय उपचार केंद्र, संशोधन केंद्र आदी ठिकाणी जावे लागत असल्याने विद्यापीठाशी संलग्नित महाविद्यालयाचे वसतिगृह, केंद्र येथे कोरोनामुळे निवासाची व्यवस्था होणार नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विद्यार्थ्यांना इंटर्नशीपमध्ये खोली घेऊन राहण्यासाठी रुपये १५ हजार भत्ता देण्याच्या घोषणेनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (२५-११-२०२२) :** (१) होय.

(२) नाही.

सद्य:स्थितीत महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या पशुवैद्यकीय विद्यार्थ्यांना रुपये ७५००/- (भाकृअप हिस्सा रुपये ३०००+ विद्यापीठ हिस्सा रुपये ४५००/-) एवढा आंतरवासिता भत्ता देण्यात येत आहे.

(३) नागपूर पशुवैद्यक महाविद्यालय, नागपूर व क्रांतीसिंह नाना पाटील पशुवैद्यक महाविद्यालय, शिरवळ येथील वसतिगृहे COVID-१९ चा प्रादुर्भाव झालेल्या व्यक्तींच्या विलगीकरणाच्या दृष्टीने अधिगृहीत करण्यात आल्यामुळे सदर काळात विद्यार्थ्यांना उपलब्ध होवू शकली नाहीत. तथापि, सद्य:स्थितीत सर्व वसतिगृहे महाविद्यालयांच्या ताब्यात मिळाली असून सद्य:स्थितीत विद्यार्थ्यांच्या वापरात आहे.

(४) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांना आंतरवासिता भत्त्यामध्ये वाढ करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वाफगाव (ता.खेड, जि.पुणे) येथील यशवंतराव होळकरांचा वाडा शासनाच्या ताब्यात घेऊन त्याची डागडुजी करण्याबाबत

**(३) ११७५० (३०-०३-२०२२) श्री.गोपिचंद पडळकर :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाफगाव (ता.खेड, जि.पुणे) येथील यशवंतराव होळकर यांचा सद्य:स्थितीत रयत शिक्षण संस्थेच्या अखत्यारीत असलेला ऐतिहासिक महत्त्व लाभलेला वाडा अतिशय दुर्गम अवस्थेत असल्याने मा.लोकप्रतिनिधी यांनी सदरहू वाडा हा रयत शिक्षण संस्थेकडून काढून पुरातत्व विभागाकडे द्यावा व त्याची डागडुजी करून सुशोभीकरण करावे अशी मागणी मा.मुख्यमंत्री यांना दिनांक ३ डिसेंबर, २०२० रोजी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यशवंतराव होळकर यांचा जन्म वाफगाव (ता.खेड, जि.पुणे) येथे दिनांक ३ डिसेंबर, १७७६ रोजी झाला असून त्या काळापासून ह्या वाड्याला मोठे ऐतिहासिक महत्त्व आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू वाडा शासनाच्या ताब्यात घेऊन त्याची डागडुजी करण्याच्या होत असलेल्या मागणीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२५-११-२०२२) :** (१) अशा आशयाची मागणी श्री.भगवानराव जऱ्हाड, महासचिव, श्रीमंत महाराजा यशवंतराव होळकर स्मारक संवर्धन समिती यांनी दिनांक ०२/०२/२०२१ रोजीच्या निवेदनाद्वारे मा.मुख्यमंत्री यांना केली आहे.
(२) होय.
(३) वाफगाव (ता.खेड, जि.पुणे) येथील यशवंतराव होळकर यांचा वाडा राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित करण्याची कार्यवाही विचारधीन आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मत्स्यमारी सहकारी सोसायटीमार्फतच्या मासेमारी धोरणांत बदल करुन क्रियाशील मच्छिमार सदस्यांना थेट परवाने देण्याबाबत

**(४) १२००२ (३०-०३-२०२२) श्री.अंबादास दानवे :** सन्माननीय **मत्स्यव्यवसाय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मच्छिमार सहकारी सोसायट्यांच्या माध्यमातून केल्या जाणाऱ्या मासेमारी व्यवसायात क्रियाशील मत्स्यव्यावसायिकाला मेहनतीचा मोबदला मिळत नसल्याने शासकीय धोरण बदलण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, वर्षानुवर्षे सुरु असलेले सोसायटी पध्दतीचे धोरण बदलून क्रियाशील सदस्यांना थेट परवाने देण्याची मागणी मच्छिमार बांधवांनी शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सोसायटी पध्दतीचे धोरण बदलून क्रियाशील मच्छिमार सदस्यांना थेट परवाने देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०२-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.
(२) अशा प्रकारची मागणी शासनाकडे केल्याचे आढळून येत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कोंढाली (ता.काटोल, जि.नागपूर) या गावाला अप्पर तहसिल कार्यालयाचा दर्जा तसेच येथील ग्रामपंचायतीला नगरपंचायतीचा दर्जा देण्याबाबत

**(५) १३०९६ (३०-०३-२०२२) श्री.अभिजित वंजारी :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) काटोल (जि.नागपूर) तालुक्याची लोकसंख्या सातत्याने वाढत असल्याने व तालुक्याचे क्षेत्रफळ मोठे असल्यामुळे तसेच डोंगराळ व आदिवासी बहूल भागामुळे तेथील प्रशासनिक कामे करण्यात प्रशासनास अडचणी येत असल्याचे माहे डिसेंबर २०२१ मध्ये व त्यादरम्यान निदर्शनास आले आहे,हे खरे आहे काय,
(२) असल्यास, काटोल तालुक्यातील महसूल सर्कलच्या भागातील कोंढाली या गावात तालुका किंवा अप्पर तहसिल कार्यालय करण्याची तसेच येथील ग्रामपंचायतीला नगरपंचायतीचा दर्जा देण्याची तेथील जनतेची मागणी असल्याने सदर गावात तहसिल कार्यालय करण्यासंदर्भात आवश्यक असलेल्या बाबींची पूर्तता करण्यात आली आहे काय
(३) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने शासनाने काटोल तालुक्याचे विभाजन करुन कोंढाली गावाला अप्पर तहसिल कार्यालयाचा दर्जा देण्याबाबत तसेच येथील ग्रामपंचायतीला नगरपंचायतीचा दर्जा देण्यासंदर्भात शासनाने निर्णय घेतला आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (०३-११-२०२२) :** (१) होय हे खरे आहे.
(२) अपर तहसिल कार्यालय निर्मितीबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त होताच धोरण निश्चितीनंतर उचित कार्यवाही करण्यात येईल. तसेच ग्रामपंचायतीला नगरपंचायतीचा दर्जा देण्याबाबतची कार्यवाही नगरविकास विभागामार्फत सुरू आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वडिलोपार्जीत शेतीवर चुकीने झालेली यु.एल.सी. ची नोंद रद्द करणेबाबत.

**(६) १३४८७ (२०-०५-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजा कांद्री (कन्हान) (ता.पारशिवनी जि.नागपूर) येथील श्री.जयराम माधोराव मेहरकूळे व इतर ५ यांच्या वडीलोपार्जीत शेती सर्वे क्र.२०४/१ (जुना २०४) तलाठी साझा क्र.१५अ आराजी ०.७८ हे.आर. या जमीनीवर सक्षम अधिकाऱ्यांच्या चुकीने यु.एल.सी. नोंद करण्यात आली असल्याची तक्रार संबंधित अधिकाऱ्यांकडे वारंवार करूनही कार्यवाही झालेली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यांस, या शेतजमीनीच्या सर्व जुन्या व नवीन शासकीय अभिलेखात कुठेही यु.एल.सी. ची नोंद नसून संबंधित तहसिलदार यांनी याबाबतचा अहवाल जिल्हाधिकारी कार्यालयांस सादर करूनही त्याची दखल घेतली गेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदरहू जमिनीची यु.एल.सी. ची नोंद रद्द करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (०४-११-२०२२) :** (१), (२), (३) व (४) श्री.जयराम माधोराव मेहरकुळे यांच्या मौजा कांद्री येथील स.नं.२०४/१ (जुना २०४) क्षेत्र ०.७८ हे.आर जमीनीवर यु.एल.सी.ची नोंद नाही. तसेच या जमिनीवर चुकीने यु.एल.सी. ची नोंद करण्यात आल्याची तक्रार श्री.जयराम माधोराव मेहरकुळे यांनी तहसिलदार पारशिवनी, जि.नागपूर तसेच नागरी जमीन कमाल धारणा, जिल्हाधिकारी नागपूर कार्यालयास केलेला नाही. सदर जमिनीवर यु.एल.सी. अंतर्गत कार्यवाही करण्यात आली नसल्याने यु.एल.सी.ची नोंद रद्द करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मायवाडी (ता.मोर्शी, जि.अमरावती) येथील शासनातर्फे मंजूर मायवाडी जैविक खत कारखाना कार्यान्वित करणेबाबत

**(७) १३५०० (२९-०४-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मायवाडी (ता.मोर्शी, जि.अमरावती) क्षेत्रातील बेरोजगारांना रोजगार मिळावा व शेतकऱ्यांना जैविक खत उपलब्ध व्हावे या हेतूने मायवाडी जैविकखत कारखाना प्रकल्पाला शासनाने मंजूरी देवून सन २०१९ मध्ये वा त्यादरम्यान या कामाचे भुमिपूजन करण्यात आले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकल्पाचे बांधकामाची सद्यास्थिती काय आहे, बांधकाम सुरू झाले नसल्यास त्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, मोर्शी विधानसभा मतदार संघात एम.आय.डी.सी. परिसरातअद्यापपर्यंत एकही मोठ्या उद्योगाची स्थापना करण्यात आली नसून सदर परिसरातील बेरोजगारांना रोजगाराची संधी मिळावी तसेच परिसरातील उपलब्ध जल व नैसर्गिक साधन संपत्तीचा योग्य विनियोग व्हावा या हेतूने नियोजित जैविक खत प्रकल्पाचे काम शासन तातडीने सुरु करणार आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने मायवाडी जैविकखत कारखाना प्रकल्प तातडीने सुरु व्हावा यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.अब्दुल सत्तार (२१-१२-२०२२) :** (१) सन २०१८-१९ मध्ये प्रॉम (फॉस्फेट रिच ऑर्गनिक मॅन्युअर) हे सेंद्रिय खत उत्पादित करण्यासाठीच्या प्रकल्पास मंजूरी मिळाली होती.
(२) मायवाडी (ता.मोर्शी, जि.अमरावती) येथे राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत सन २०१८-१९ मध्ये प्रॉम (फॉस्फेट रिच ऑर्गनिक मॅन्युअर) हे सेंद्रिय खत उत्पादित करण्यासाठीच्या प्रकल्पास महाराष्ट्र कृषी उद्योग महामंडळास मंजूरी मिळाली होती. परंतु, सहा वेळेस निविदेस मुदतवाढ देऊनही निविदाकारांनी सहभाग नोंदविलेला नाही. अंतिम निविदा स्विकृती कालावधी संपल्यानंतर फक्त एक निविदा प्राप्त झाली. प्राप्त निविदेचा खर्च अवाजवी असल्यामुळे सदरचा प्रकल्प आर्थिकदृष्ट्या अव्यवहार्य असल्यामुळे रद्द करण्यात आलेला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथील जिल्हाधिकारी कार्यालयाच्या नव्या इमारतीकरिता निधीची तरतूद करण्याबाबत

**(८) १३६२३ (२०-०५-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथील जिल्हाधिकारी कार्यालयाच्या नव्या इमारतीकरीता वर्ष २०२१-२०२२ च्या अर्थसंकल्पात २०० कोटी रूपये निधीची तरतुद घोषित करण्यात आली होती हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अद्यापपर्यंत हा निधी संबंधित विभागास प्राप्त झाला नाही हेही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सध्याची जिल्हाधिकारी कार्यालयाची इमारत प्राचीन व जीर्ण झाली असल्याने सर्व विभाग एकाच इमारतीत आणून प्रशासन अधिक कार्यक्षम करण्याबाबत अर्थसंकल्पात तरतुद केलेला निधी तातडीने उपलब्ध करून देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (०४-११-२०२२) :** (१) व (२) होय.

(३) जिल्हाधिकारी कार्यालयाच्या नव्या इमारत बांधकामाचा रुपये २५१.५२ कोटी रकमेचा प्रस्ताव शासन स्तरावर प्राप्त असून प्रस्तावाची तांत्रिक छाननी सुरु असून प्रशासकीय मान्यतेनंतर निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## श्रीराम विजाभज प्राथमिक आश्रम शाळा, पिंपळखुटा (तालुका दारव्हा, जि.यवतमाळ) येथील कर्मचाऱ्यांच्या थकीत वेतनाबाबत

**(९) १३६८२ (२५-०८-२०२२) श्री.किरण सरनाईक : तारांकित प्रश्न क्रमांक १२३४६ ला दिनांक ३ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **इतर मागास बहुजन कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) श्रीराम विजाभज प्राथमिक आश्रम शाळा, पिंपळखुटा (तालुका दारव्हा, जि.यवतमाळ) येथील कर्मचाऱ्यांचे वेतन थकीत असल्याची बाब माहे मे, २०२२ च्या पहिल्या सप्ताहात वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाने दिनांक १४ जानेवारी, २०२२ रोजी वा त्यासुमारास निर्गमित केलेल्या परिपत्रकान्वये सदर शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे थकित व नियमित वेतन अदा करणेबाबत निर्देश देण्यात आले असून क्षेत्रिय कार्यालयाकडून कार्यवाही चालू आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, दिनांक १५ फेब्रुवारी, २०२२ रोजी काढण्यात आलेल्या शासन निर्णयान्वये महात्मा ज्योतिबा फुले शिक्षण प्रसारक मंडळ, जळकोट (ता.तुळजापुर, जि.उस्मानाबाद) संचलित श्रीराम विजाभज प्राथमिक आश्रमशाळा ही पुढील सत्रापासून पिंपळखुटा (तालुका दारव्हा, जि.यवतमाळ) येथे पूर्ववत सुरु करण्याचे आदेशित करण्यात आले आहे याबाबत शासन करीत असलेल्या कार्यवाहीची सद्य:स्थिती काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.अतुल सावे (१६-१२-२०२२) :** (१), (२) व (३) शासन पत्र दिनाक १४/०१/२०२ व ०२/०५/२०२२ अन्वये दिलेल्या आदेशानसार प्राथमिक आश्रमशाळा पिंपळखुटा, ता.दारव्हाह, जि.यवतमाळ येथील सर्व शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे माहे जून ते डिसेंबर, २०२१ या कालावधीतील वेतन अदा करण्यात आले आहे. सदर आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांची याच आशयाची मा.उच्च न्यायालय, मुंबई, खडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्र.१७०२/२०२२ प्रलंबित आहे. तसेच सदर आश्रमशाळा पूर्ववत पिंपळखुटा, ता.दारव्हा, जि.यवतमाळ येथे सुरु करण्याबाबतच्या दिनांक १५/०२/२०२२ रोजीच्या शासन निर्णयाविरध्द संबंधित संचालक यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई क्र.८२८४/२०२२ वर मा.उच्च न्यायालयाने दिनांक ३०/०८/२०२२ रोजी "जैसे थी" स्थिती ठेवण्याचे आदेश दिले आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परभणी जिल्हा रुग्णालयाकडून बोगस अपंग प्रमाणपत्र वितरीत केल्याबाबत

**(१०) १३८५९ (०७-०७-२०२२) श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.सतिश चव्हाण : दिनांक १५ डिसेंबर, २०२० रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक १३ मधील प्रश्न क्रमांक ३५५९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्हा सामान्य रूग्णालयातील अधिकाऱ्यांनी लाखो रूपये घेवून बोगस अपंग प्रमाणपत्र देऊन, अपात्रांना पात्र बनवून लाभ दिल्याप्रकरणी झालेल्या तक्रारीवरून आरोग्य उपसंचालक, औरंगाबाद यांनी सहा सदस्यांची चौकशी समिती सन २०२२ मध्ये वा त्यादरम्यान स्थापन केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर समितीने जिल्हा रूग्णालयातील गैरप्रकाराची चौकशी करून उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद यांच्याकडे अहवाल सादर केला आहे काय व त्याची थोडक्यात सविस्तर माहिति काय आहे,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने बोगस प्रमाणपत्र देणारे अधिकारी तसेच, बोगस प्रमाणपत्राचा लाभ घेवून फायदा मिळविणारे संबंधितांविरूध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. तानाजी सावंत (२३-११-२०२२) :** १) होय, हे खरे आहे.

(२) व (३) होय.

चौकशीअंती तक्रारदाराने चौकशी समितीसमोर कोणताही पुरावा अथवा नावाचा उल्लेख असल्याचा पुरावा दिलेलला नाही. तसेच यापूर्वी गैरमार्गाने दिव्यांग प्रमाणपत्र वितरीत झाल्याबाबत पोलीस स्टेशन नानलपेठ परभणी येथे गुरनं १४५/२०२१ दिनांक ३१/०३/२०२१ अन्वये भादंवि ४२०, ४६८, ४७१, ६५, ७३, ७४ अन्वये गुन्हा दाखल केलेला असून सदरील प्रकरण अन्वेषाधीन आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सेलू (जि.परभणी) तालुक्यातील अवैध गौण खनिज उत्खननाबाबत

**(११) १३८६१ (२५-०८-२०२२) श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक १२०८२ ला दिनांक ७ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सेलू (जि.परभणी) तालुक्यातील ५ स्ट्रोन क्रेशधारकांनी सुमारे ३३ हजार ब्रासचे बेकायदेशीर उत्खनन केल्याची बाब ड्रोण व्दारे केलेल्या मोजणीतून निर्दशनास आल्यावरून तहसिलदार यांनी सन २०२१-२२ दरम्यान पाच क्रेशरधारकांनी ३२ कोटी रूपयांच्या दंडाची नोटीस बजावली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वरील सर्व स्टोन क्रेशरधारकांकडून अवैध उत्खननाबाबतची रक्कम वसूल करण्यात आली आहे काय,

(३) असल्यास, संबंधित स्टोनक्रेशरधारक व जिल्हा गौण खनिज अधिकारी कार्यालय यांच्या स्तरावरून सदरील प्रकरण दडपण्याचा प्रकार करण्यात येत असल्याबाबतची तक्रार परभणी येथील सामाजिक कार्यकर्त्यांनी मा.विभागीय आयुक्त औरंगाबाद यांच्याकडे केल्यावरून त्यांची चौकशी करण्यात आली आहे काय,

(४) असल्यास, चौकशीच्या अनुषंगाने दोषी अधिकारी व स्टोन क्रेशरधारक यांच्यावर कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (२९-११-२०२२) :** (१), (२), (३), (४) व (५) सेलु तालुक्यातील ०५ स्टोन क्रेशरधारकाने उत्खनन केल्याबाबतचा ताळमेळ अहवाल सादर न केल्याच्या कारणास्तव तहसिलदार, सेलु यांनी संबंधित स्टोन क्रेशरधारकांस नोटीस दिली होती. यानुसार संबंधित क्रेशरधारकाने तहसिलदार, सेलू यांना ताळमेळ अहवाल सादर केला. सदर अहवालनुसार उत्खनन व भरणा केलेले स्वामीत्वधन यामध्ये कोणताही फरक दिसून आलेला नाही.

---

## अंबरनाथ आणि बदलापूरातील (जि.ठाणे) नोंदणी कार्यालये ही अत्यंत अडगळीच्या ठिकाणी असल्यामुळे येथे काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांसह नागरिकांना कोंदट सहन करावे लागत असल्याबाबत

**(१२) १४०८९ (२५-०८-२०२२) डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अंबरनाथ आणि बदलापूर येथील (जि.ठाणे) नोंदणी कार्यालये ही अत्यंत अडगळीच्या ठिकाणी असल्यामुळे येथे काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांसह नागरिकांना कोंदटपणाचा त्रास सहन करावे लागत असल्याचे नुकतेच माहे मे, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, बदलापूर शहरात दोन नोंदणी कार्यालये असून ही दोन्ही कार्यालये अत्यंत कमी जागेच्या ठिकाणी सुरु करण्यात आली आहेत हेही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर कार्यालयाची पाहणी शासनाने केली आहे काय,त्यात काय आढळून आले,
(४) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने बदलापूर शहरात दोन्ही नोंदणी कार्यालयाला पर्यायी जागा देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत,

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (०२-११-२०२२) :** (१) व (२) हे खरे नाही.

अंबरनाथसाठी दुय्यम निबंधक कार्यालय हे उल्हासनगर येथील क्र.३ हे कार्यालय असून ते तहसिल कार्यालयाचे आवारात शासकीय इमारतीत आहे. तसेच बदलापूर पूर्व येथील सह दुय्यम निबंधक उल्हासनगर क्र.२ (२०३५.२५ चौ.फूट जागेत) व बदलापूर पश्चिम येथील सह दुय्यम निबंधक उल्हासनगर क्र.४ (२००० चौ.फूट जागेत) ही कार्यालये खाजगी जागेत कार्यरत असून सदरहू तिनही कार्यालयीन जागेत अभ्यागत कक्षासह किमान सुविधा उपलब्ध आहेत.
(३) व (४) बदलापूर परिसरात शासकीय भूखंड उपलब्ध होण्याकरीता मा.उपविभागीय अधिकारी तथा वसाहत अधिकारी, उल्हासनगर यांचेकडे पाठपूरावा सुरु असून भूखंड उपलब्ध होताच त्यावर स्वतंत्र इमारत बांधून बदलापूर येथील सह दुय्यम निबंधक उल्हासनगर क्र. २ व ४ ही दोन्ही कार्यालये एकाच ठिकाणी स्वतंत्र वेळामध्ये सुरु ठेवून नागरिकांना अधिक चांगल्या प्रकारे सेवा देण्याचे प्रयोजन आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्र राज्य सहकारी बँक आणि राज्यातील जिल्हा बँकाकडून कर्ज घेतलेल्या संस्थांकरीता एक रक्कमी परतफेड ही योजना राबविण्याबाबत

**(१३) १४६२५ (२५-०८-२०२२) श्री.सुनिल शिंदे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र राज्य सहकारी बँक आणि राज्यातील जिल्हा बँकाकडून कर्ज घेतलेल्या सहकारी साखर कारखाने, सुत गिरण्या आणि इतर सहकारी संस्थांकडे थकीत असलेले कर्ज यांची एक रक्कमी परतफेड (वन टाईम सेटलमेंट) करता यावी याकरीता शासनाने स्वतंत्र योजना अंमलात आणण्यासाठी अभ्यासगट स्थापन केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त अभ्यासगट कोणाच्या अध्यक्षतेखाली निर्माण करण्यात आला आहे व त्याचे सदस्य कोण आहेत,
(३) असल्यास, सदर अभ्यासगट किती कालावधीत शासनाकडे केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सादर करणार आहे, त्यानुषंगाने शासनाने केलेल्या कार्यवाहीची सद्य: स्थिती काय आहे ?

**श्री.अतुल सावे (३१-१०-२०२२) :** (१) होय.

(२) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दिनांक १७/०३/२०२२ च्या शासननिर्णयाद्वारे सदर अभ्यासगट स्थापन करण्यात आला आहे. सदर अभ्यासगटाच्या अध्यक्षपदी सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे यांची आणि सहअध्यक्षपदी साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच या अभ्यासगटाच्या सदस्यपदी खालील अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली आहे:

(i) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

(ii) प्रशासक/ कार्यकारी संचालक, दि महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई.

(iii) मुख्य कार्यकारी अधिकारी, सांगली जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, सांगली.

(iv) अपर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, सहकार आयुक्तालय, पुणे. (सचिव)

(३) सदर समितीच्यामार्फत अहवाल तयार करण्याचे काम सुरु आहे.

---

## बृहन्मुंबई दुध योजना वरळी आणि कुर्ला येथील आरे दुग्ध शाळेच्या अंतर्गत येणारी आरेची दुध केंद्रे महिला बचत गटांना चालविण्यास देण्याबाबत

**(१४) १४७४१ (२५-०८-२०२२) श्री.नागोराव गाणार, श्री.चंद्रशेखर बावनकुळे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रामदास आंबटकर, श्री.प्रवीण दटके, श्री.रमेशदादा पाटील, श्री.रमेश कराड, श्री.महादेव जानकर, श्री.प्रविण दरेकर : तारांकित प्रश्न क्रमांक १३२९० ला दिनांक २१ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **दुग्धविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बृहन्मुंबई दुध योजना वरळी आणि कुर्ला येथील आरे दुग्ध शाळेच्या अंतर्गत येणारी आरेची दुध केंद्रे महिला बचत गटांना चालविण्यास देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मंजूर असलेली सर्व आरे दुध केंद्रे चालू असून या दुध केंद्रावर आरे दुधजन्य पदार्थाशिवाय इतर अनेक पदार्थ विकले जात असतानाही आरे प्रशासनाकडून या केंद्राची तपासणी करण्यात येत नाही हे ही खरे काय,

(३) असल्यास, आरे दुध केंद्रावर महानंद डेअरीची आणि इतर अन्य डेअरीच्या दुग्धजन्य पदार्थाशिवाय इतर वस्तू विकण्यास मनाई करण्यात येणार काय,

(४) असल्यास, आरे दुध केंद्रे महिला बचत गटांना चालविण्यास देत असताना ज्यांच्या नावावर केंद्रे आहेत त्यांना व त्यांच्या घरातील वारसांना ही केंद्रे चालविण्यासाठी कोणत्या अटी शासन घालणार आहे,

(५) असल्यास, सदर अटींची यादी या केंद्रावर लावण्याचे आदेश शासन देणार आहेत काय,

(६) असल्यास, याबाबत शासनाने चौकशीकरुन राज्यभरातील आरे दुध केंद्र चालविण्यास देण्याच्या शुल्कात बदल करुन बाजार भावाच्या दरापेक्षा कमीदराने स्थानिक नागरिकांना व महिला बचत गटांना देण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(७) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (१२-१२-२०२२) :** (१) आरे स्टॉल वाटपासाठी दिनांक २९/०७/२०२२ व दिनांक ०३/०८/२०२२ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या धोरणानुसार महिला बचत गटास ५ टक्के आरक्षण देण्यात आले आहे.
(२) व (३) दिनांक २९/०७/२०२२ व दिनांक ०३/०८/२०२२ च्या धोरणानुसार आरे ब्रँन्डच्या पदार्थाशिवाय अन्य सहकारी व व्यावसायिक संस्थांचे दुध व दुग्धजन्य पदार्थ विकण्यास अनुमती देण्यात आली असून केंद्राच्या आत गॅस किंवा शेगडी ठेऊन कोणतीही प्रक्रिया करुन तयार करण्यात येणारे पदार्थ तसेच सुट्टे दुध विकण्यास प्रतिबंध आहे.
(४), (५), (६) व (७) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कडेगाव तालुक्यातील (ता.जि.सांगली) ६४ सर्व सेवा सहकारी सोसायटींचा कार्यभार सांभाळण्यासाठी सचिवांची नियुक्ती करण्याबाबत

**(१५) १४७९६ (२५-०८-२०२२) श्री.अरुण लाड :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कडेगाव (जि.सांगली) तालुक्यातील सर्व ६४ सेवा सहकारी सोसायटया असून या सोसायटयांचा कार्यभार सांभाळण्यासाठी २१ सचिवांची नियुक्ती करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सेवा सहकारी सोसायटीच्या तुलनेनुसार सचिवांच्या नियुक्तीची संख्या कमी असून सचिवांवर कामाचा अतिरिक्त ताण वाढत असून याचा शेतकऱ्यांच्या कामांवर परिणाम होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने ६४ सर्व सेवा सहकारी सोसायटींचा कार्यभार सांभाळण्यासाठी सचिवांची पदे वाढविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही अथवा उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.अतुल सावे (२४-११-२०२२) :** (१) अंशत: खरे आहे. कडेगांव तालुक्यामध्ये एकूण ६४ सेवा सहकारी सोसायट्या असून त्या सोसायट्यांचा कार्यभार सांभाळण्यासाठी २४ सचिवांची नियुक्ती करण्यात आली आहे.
(२) अंशत: खरे आहे.
सर्व गटसचिव त्यांच्या पदभारातील सर्व संस्थांची कामे व्यवस्थितपणे पार पाडत आहेत. तथापि, कर्जमाफी योजनेच्या वेळी जिल्ह्यातील काही गटसचिवांकडे एकापेक्षा जास्त संस्था पदभारात असल्यामुळे कामकाजाचा ताण तेवढ्यापुरता होता.तथापि, सर्व गटसचिवांकडून शेतकऱ्यांची संस्थांकडे असणारी कामे वेळेत पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात येते आहे.
(३) वैद्यनाथन समितीच्या शिफारशीनुसार विविध कार्यकारी सेवा सोसायट्यांना संस्थेचा सचिव नेमणूकीचे अधिकार देण्यात आले आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सांगली (ता.कडेगाव) जिल्ह्यातील ३६ गावांचे नगर भूमापन अद्यापही झाले नसल्याने सीटीसर्वे नकाशा व उताऱ्यांपासून नागरिक वंचित असल्याबाबत

**(१६) १४८१२ (२५-०८-२०२२) श्री.अरुण लाड :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सांगली (ता.कडेगाव) जिल्ह्यातील ३६ गावांचे नगर भूमापन अद्यापही झाले नसल्याने सीटीसर्वे नकाशा व उताऱ्यांपासून नागरिक वंचित आहेत हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या गावांचे नगर भूमापन न करण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने या गावांचे नगर भूमापन करण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (०५-१२-२०२२) :** (१) व (२) हे खरे आहे.

कडेगांव तालुक्यातील प्रलंबित ३६ गावे ही मुलत: २००० लोकसंख्येचे आतील असल्याने सदर गावांस नगर भूमापन योजना यापूर्वी लागू करण्यात आलेली नव्हती.

(३) शासन निर्णय दिनांक २२/०२/२०१९ नुसार ड्रोनव्दारे गांवठाण जमाबंदी प्रकल्प राबविण्यापूर्वी सांगली जिल्ह्यातील कडेगांव तालुक्यातील एकूण ५६ गावांपैकी २० गावांमध्ये नगरभूमापन योजना लागू झाली असून सदर गावे परिरक्षणास घेण्यात आली आहेत. सांगली जिल्ह्यातील कडेगांव तालुक्यातील उर्वरित ३६ गावांचे गावठाणातील मिळकतींचे नगर भूमापन योजनेचे काम सूरू असून माहे सप्टेंबर, २०२२ मध्ये भारतीय सर्व्हेक्षण विभागाकडून सदर गावांचे ड्रोनव्दारे सर्व्हेक्षणाचे काम पूर्ण झाले असून पुढील काम मार्च, २०२३ पर्यंत पूर्ण करण्याच्या सूचना क्षेत्रिय कार्यालयास देण्यात आलेल्या आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## भुविकास बँकेच्या कर्जदार व उपसा सिंचन योजनेच्या माफीबाबत तसेच कर्मचारी वर्गाची थकीत देणी देण्याबाबत

**(१७) १४८१५ (२५-०८-२०२२) श्री.शशिकांत शिंदे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भूविकास बँकेमार्फत वितरीत केलेल्या ३३८१५ थकबाकीदार कर्जदारांच्या कर्जमाफी संदर्भात तसेच पाणी उपसा सिंचन योजनांच्या कर्जमाफीसंदर्भात निर्णय घेण्यात आल्याचे सन २०२२-२०२३ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये शासनाने सभागृहात घोषित केले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यानुसार संस्थेच्या राज्यभरातील २६ जिल्हा मुख्यालयाच्या मालमत्तेपैकी काही मालमत्ता शासन खरेदी करुन त्यामधून येणाऱ्या रकमेतून कर्मचाऱ्यांची देणी देण्याचेही ठरविण्यांत आले असल्याचेही तसेच शेतकऱ्यांच्या सातबारा उताऱ्यावरील शिक्के रद्द करण्याचे त्यावेळी शासनाने जाहीर केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने तसा निर्णय घेऊन बराचसा कालावधी होऊनही यासंदर्भात अद्याप कोणतीही कार्यवाही झालेली नसल्याचे दिनांक १५ जून, २०२२ रोजी वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने या दोन्ही बाबींसदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.अतुल सावे (०९-१२-२०२२) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

भुविकास बँकेच्या ३४,७८८ कर्जदार शेतकऱ्यांची ९६४.१५ कोटी रुपयांची कर्जमाफी करुन सदर रक्कम भुविकास बँकांकडून शासनास येणे असलेल्या रक्कमेमध्ये समायोजीत करणेबाबत तसेच कर्मचाऱ्यांची रुपये २७५.४० कोटी देणी अदा करुन त्यापोटी भुविकास बँकांच्या मालमत्ता शासनाकडे वर्ग करण्याची घोषणा सन २०२२-२०२३ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये तत्कालीन मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांनी सभागृहात केली होती.
(३) व (४) भुविकास बँकांच्या थकबाकीदार कर्जदारांची कर्जमाफी करुन सदर रक्कम भुविकास बँकांकडून शासनास येणे असलेल्या रक्कमेमध्ये समायोजीत करणेबाबत, तसेच बँकांच्या कर्मचाऱ्यांची थकीत देणी अदा करुन बँकांच्या मालमत्ता शासनाकडे हस्तांरीत करण्याच्या प्रस्तावास मा.मंत्रीमंडळाने दिनांक २०/१०/२०२२ रोजी मान्यता दिली असून त्यानुषंगाने दिनांक ०९/११/२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर जिल्हा परिषदेच्या पशुसंवर्धन विभागामार्फत प्रस्तावांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता मिळण्यास ही मंजुरी तातडीने प्राप्त करून देऊन लाभार्थी शेतकऱ्यांना या योजनेचा लाभ मिळवून देण्याबाबत

**(१८) १४९५२ (०८-०७-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर जिल्हा परिषदेच्या पशुसंवर्धन विभागामार्फत शेतकऱ्यांना गायी, शेळया, कोंबड्या वाटप योजनेकरिता सामाजिक कल्याण विभागाकडून वाढीव निधी प्राप्त झाला असून त्यानुसार नव्याने प्रस्ताव तयार करण्यात आले आहेत हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मार्च, २०२२ अखेरीपर्यंत या प्रस्तावांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्राप्त झाली नसल्याने चालु आर्थिक वर्षात लाभार्थी शेतकरी या योजनेपासून वंचित राहणार आहेत हेही खरे आहे काय,
(३) असल्यास,याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने प्रशासकीय व तांत्रिक मान्यता मिळण्यास ही मंजुरी तातडीने प्राप्त करून देऊन लाभार्थी शेतकऱ्यांना या योजनेचा लाभ मिळवून देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (१६-१२-२०२२) :** (१) सन २०२१-२२ मध्ये विशेष घटक योजनेंतर्गत अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना ७५ टक्के अनुदानावर दुधाळ जनावरांचे गट व शेळी/ मेंढी गट वाटप करण्याकरीता समाजकल्याण विभाग, नागपूर यांचेकडून दिनांक २८/०३/२०२२ च्या निधी वितरण आदेशान्वये पशुसंवर्धन विभाग, जिल्हा परिषद, नागपूर यांना रुपये १२८३.१९ लक्ष निधी प्राप्त झालेला असून, यामध्ये कुक्कुट गट वाटपासाठी निधी प्राप्त झालेला नाही.
(२) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे विविध ०२ कार्यालयीन पत्र दिनांक ०४/११/२०२२ अन्वये दुधाळ जनावरांचे गट वाटप आणि शेळी/ मेंढी गट वाटप योजनेस तांत्रिक मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, पशुसंवर्धन विभाग, जिल्हा परिषद, नागपूर यांचे विविध ०२ आदेश दिनांक १६/०३/२०२२ अन्वये दुधाळ जनावरांचे गट वाटप आणि शेळी/ मेंढी गट वाटप योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

सदरचा निधी पशुसंवर्धन विभागास माहे मार्च, २०२२ मध्ये प्रत्यक्ष प्राप्त झालेला असून लाभ घेण्यास इच्छुक असलेल्या पात्र लाभार्थ्यांना उपलब्ध निधीच्या अधिन राहून माहे मार्च, २०२३ अखेर पर्यंत लाभ देण्यात येणार आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मोनो रेल्वेवर प्रवाशांची संख्या वाढविण्याबाबत

**(१९) १५००० (२५-०८-२०२२) श्री.सुनिल शिंदे, श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मोनो रेल्वेला संत गाडगे महाराज चौक स्थानक ते महालक्ष्मी रेल्वे स्थानकापर्यंत उपनगरीय रेल्वे मार्गिकेशी जोडणी नसल्यामुळे प्रवाशांचा अपेक्षित प्रतिसाद मिळत नसल्याचे दिनांक १४ जून, २०२२ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मोनो रेल्वेवर प्रवाशांची संख्या वाढविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२४-११-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) चेंबूर ते संत गाडगे महाराज चौक मोनोरेल प्रकल्पांतर्गत कार्यरत असलेले संत गाडगे महाराज चौक स्थानक हे महालक्ष्मी मेट्रो आणि महालक्ष्मी उपनगरीय रेल्वे स्थानकास पादचारी पुलाव्दारे जोडण्यासाठी सविस्तर प्रकल्प अहवाल (डीपीआर) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत तयार करण्याचे काम प्रगतीपथावर आहे.

---

## राज्यातील सेवा सोसायट्यांचे संगणकीकरण करणेबाबत

**(२०) १५८७१ (२८-१२-२०२२) श्री.रणजितसिंह मोहिते-पाटील :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) देशातील सर्व कार्यकारी सेवा सोसायट्यांचे संगणकीकरण करण्याचा केंद्रीय सहकार मंत्रालयाद्वारे निर्णय घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्या अंतर्गत राज्यातील सुमारे १२ हजार सेवा सोसायटयांचे केंद्र व राज्य शासनाच्या हिश्श्यातून संगणकीकरण करण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने राज्यातील सेवा सोसायटयांचे संगणकीकरण करण्यासंदर्भात कोणती कार्यवाही वा उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.अतुल सावे (११-०१-२०२३) :** (१) अंशत: खरे आहे.

केंद्र शासनाने निश्चित केलेल्या मार्गदर्शक सुचनेच्या निकषात बसणाऱ्या प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे संगणकीकरण करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.
(२) हे खरे आहे.
(३) केंद्र पुरस्कृत प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे संगणकीकरण या योजनेस शासन निर्णय दिनांक ०७/१०/२०२२ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत सन २०२२-२३ ते सन २०२४-२५ या ३ वर्षाच्या कालावधीत प्रत्येक वर्षी ४,००० अशा एकूण १२,००० प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे संगणकीकरण करण्यात येणार आहे. त्याअनुषंगाने पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :** **राजेन्द्र भागवत**
**मुंबई.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.